सन १९८४ च्या दंगलीतील मृत व्यक्तींच्या वारसांना केंद्र शासनाच्या धोरणानुसार निवृत्तीवेतन अदा करण्यासाठी रक्कम वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र. आरएलएफ-२०१५/प्र.क्र.३८/म-३,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
दिनांक :- २४ मार्च, २०१५

वाचा :- १. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.सीएलएस-०३०७/प्र.क्र.१४३/म-३, दि.२.०७.२००७,
२. विभागीय आयुक्त, नाशिक यांचे पत्र क्र.मशा/कार्या-१/आस्था-८/१५२०/२०१५, दि.२७.०१.२०१५,
३. जिल्हाधिकारी, यवतमाळ यांचे पत्र क्र.गृहशाखा/अका/डेस्क-१२/४०७/२०१५, दि.९/३/२०१५,
४. जिल्हाधिकारी, बुलढाणा यांचे पत्र क्र.गृह विभाग/कक्ष ४.२/कावि/३२२/२०१५, दि.१८/३/२०१५

**प्रस्तावना:-**

१९८४ साली झालेल्या दंगलीतील बाधीत व्यक्तींना मदत देण्यासंदर्भात न्या.नानावटी यांच्या अध्यक्षतेखाली आयोग नेमण्यात आला होता. न्या. नानावटी आयोगाच्या शिफारशीची अंमलबजावणी करण्यासाठी केंद्र शासनाने दि.१६.१.२००६ रोजी "विशेष पॅकेज" जाहीर केले. सदर पॅकेजमधील मार्गदर्शक तत्वानुसार सदर दंगलीतील संबधित बाधित व्यक्तींना उक्त संदर्भ क्र.(१) वरील शासन निर्णयानुसार मदतीच्या रकमा यापूर्वी शासनाने मंजूर केलेल्या आहेत.

२. केंद्र शासनाच्या वरील पॅकेजप्रमाणे सदर दंगलीतील मृत व्यक्तींच्या पात्र वारसदारांना निवृत्ती वेतन अदा करण्यासाठी निधी उपलब्ध करुन देण्याच्या अनुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

सन १९८४ च्या दंगलीत मृत झालेल्या व्यक्तींच्या पात्र वारसदारांना केंद्र शासनाच्या दि. १६.१.२००६ च्या पॅकेजनुसार सोबत जोडलेल्या विवरण पत्रात दर्शविल्याप्रमाणे प्रती व्यक्तीस दरमहा रुपये २५००/- याप्रमाणे निवृत्ती वेतन अदा करण्यासाठी शासन याद्वारे एकूण रुपये १.५० लक्ष (रुपये एक लक्ष पन्नास हजार ) एवढी तरतूद मंजूर करीत असून त्यापैकी विभागीय आयुक्त नाशिक यांना रु ६०,०००/-(रुपये साठ हजार फक्त ) व विभागीय आयुक्त अमरावती यांना रु ९०,०००/- रक्कम (रुपये नव्वद हजार फक्त) इतक्या रकमेचे वितरण करण्यात येत आहे.

२. यासाठी होणारा खर्च, "मागणी क्रमांक सी-५, मुख्य लेखाशीर्ष-२२३५,सामाजिक सुरक्षा व कल्याण-६०, इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम-२००, इतर कार्यक्रम- २००(०१) (०४) १९८४ च्या दंगलीतील मृत व्यक्तींच्या वारसांना निवृत्ती वेतन-(२२३५-ए ३२९) (दत्तमत) या मुख्य लेखाशीर्षाखाली सन २०१४-१५ मधील अर्थसंकल्पीय तरतुदीमधून भागविण्यात यावा.
सदर निधी अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) वर संबधित विभागीय आयुक्त यांना उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

३. नियंत्रक अधिकारी यांना याद्वारे असेही आदेश देण्यात येत आहेत की, सोबत जोडलेल्या विवरणपत्रातील मृत व्यक्तींच्या वारसांना प्रत्येकी दरमहा रुपये २,५००/- याप्रमाणे निवृत्तीवेतन

दयावयाचे असून, त्यानुसार माहे एप्रिल, २०१४ ते माहे मार्च, २०१५ या कालावधीतील निवृत्तीवेतन पात्र वारसदारांच्या हयातीची खात्री केल्यानंतर एकरकमी तात्काळ अदा करण्यात यावी.

४. आहरण व संवितरण अधिकारी यांनी कोषागार/उपकोषागार यांचेकडे पाठविण्यात येणा-या बिलासोबत जोडल्या जाणा-या कॉम्प्युटर स्लीपमध्ये गौण/उपशिर्षाच्या गणकयंत्र संकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा, असे आदेश कृपया संबंधित अधिका-यांना, नियंत्रण अधिकारी यांनी दयावेत.

५. कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा अधिक खर्च होणार नाही, याची नियंत्रण अधिकारी यांनी दक्षता घ्यावी. तसेच, खर्चाचा मेळ महालेखापाल यांनी नोंदविलेल्या खर्चाशी घेण्यात यावा व महालेखापालाच्या ताळमेळ प्रमाणपत्रासह विनियोजन लेखे शासनाकडे तात्काळ पाठवावे.

६. सदर प्रकरणी होणा-या खर्चाचे पत्रक विहीत कालमर्यादेत न चुकता महसूल व वन विभागाला प्राप्त होईल, याची दक्षता विभागीय आयुक्त, नाशिक व विभागीय आयुक्त, अमरावती यांनी घ्यावी.

७. अर्जदारांच्या हयातीचा दाखला विहित नमुन्यात घेण्यात यावा. तसेच पुढील वित्तीय वर्षाकरीता संबधितांना निवृत्तीवेतन देण्यासाठी निधीची मागणी शासनाकडे वेळेत सादर करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२४१५३०३९२९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ashok Rajaram Jagtap

Digitally signed by Ashok Rajaram Jagtap
DN: CN = Ashok Rajaram Jagtap, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2015.03.24 15:44:19 +05'30'

**(अ.रा.जगताप)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) विभागीय आयुक्त, नाशिक व अमरावती विभाग.
२) जिल्हाधिकारी, जिल्हा अहमदनगर, बुलढाणा व यवतमाळ.
३) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा अहमदनगर, बुलढाणा व यवतमाळ.
४) महालेखापाल-१ (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य,मुंबई.
५) महालेखापाल-२ (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
६) सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक शाखा,नविन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, मुंबई-३२
७) वित्त विभाग( व्यय-९/अर्थसंकल्प-६/) मंत्रालय,मुंबई-३२
८) कक्ष अधिकारी (ब-१, पीएसी व पीएसी-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
९) निवडनस्ती म-३ कार्यासन, मदत व पुनर्वसन प्रभाग

*****

शासन निर्णय क्रमांक- आरएलएफ -२०१५/ प्र.क्र. ३८/म-३, दिनांक २४.३.२०१५ सोबतचे विवरणपत्र

१९८४ च्या दंगलीत मृत झालेल्या व्यक्तींच्या वारसांना निवृत्ती वेतनाची रक्कम अदा करणे

(तपशील)

| अ.क्र. | महसूल विभाग | जिल्हा | मृत व्यक्तींचे नांव | वारसदाराचे नाव व नाते |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | नाशिक | अहमदनगर | १.श्री. पिरु उर्फ पिरन हसन सयद | १. श्रीमती सुग्रबी सयद (आई) |
| | | | २.श्री. सतपालसिंग नंदपालसिंग | २. श्रीमती दर्शन कौर सतपालसिंग बाजवा (पत्नी) |
| २ | अमरावती | बुलढाणा | १.श्री. टिकाराम देवजी सातव | १.श्रीमती कस्तुराबाई टिकाराम सातव (पत्नी) |
| | | | २. श्री. दिनकर सिताराम डाबरे | २.श्रीमती सत्यभामाबाई दिनकर डाबरे (पत्नी) |
| | | यवतमाळ | १.श्री. इकबालसिंग भाटीया | १.श्री हरबंशसिंग भाटीया (वडील) |